मा.औद्योगिक न्यायालय, भंडारा यांच्या दि.०७/०३/२०१९ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार तक्रारदार श्रीमती शेवंताबाई मनोहर गभणे व श्री. श्रीकृष्ण हरीभाउ शेंडे, रोजंदारी मजूर यांना थकबाकीच्या फरकाची रक्कम रु.८,७१,९९६/- अदा करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: न्यायप्र-२०२४/प्र.क्र.०५/१३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०१ एप्रिल, २०२४

वाचा:-

१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. युएलपी-१२२३/३५०२७/ प्र.क्र.९४/ आस्था-३/ ७६४३/२४ दि.०७/०३/२०२४.

२) मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा येथे दाखल युएलपी क्र. ८७/२०१५ व युएलपी क्र.८८/२०१५ मध्ये दि.०७/०३/२०१९ चा न्यायनिर्णय.

**प्रस्तावना:-**

श्रीमती शेवंताबाई मनोहर गभणे व श्री. श्रीकृष्ण हरीभाउ शेंडे, रोजंदारी मजुर यांनी त्यांना मजुर म्हणुन कायम करण्याची, कायम मजुरांप्रमाणे मजुरी मिळणेची तसेच सेवा खंड गृहित न धरता मजुरी मिळण्यासाठी मा. औद्योगीक न्यायालय, भंडारा येथे तक्रार युएलपी क्र.०४/१९९१ व तक्रार युएलपी क्र.१२/१९९१ दाखल केली होती त्यामध्ये मा. न्यायालयाने दि.३१/०७/२००४ रोजी न्यायनिर्णय दिला.

त्यामुळे मा.औद्योगीक न्यायालयाचा दि.३१/०७/२००४ चा न्यायनिर्णय विरोधात लागल्याने श्रीमती शेवंताबाई मनोहर गभणे व श्री. श्रीकृष्ण हरीभाउ शेंडे यांनी त्यांना पुर्ववत कामावर घेउन, नियमीत करून, मजुरीची थकबाकी मिळणेबाबत मा. कामगार न्यायालय, भंडारा येथे युएलपी क्र.४४/१९९४ व युएलपी क्र ५१/१९९४ अन्वये तक्रार अर्ज दाखल केला. त्यामध्ये मा. न्यायालयाने दि.२८/१०/२०१० रोजी सामाईक निर्णय देउन त्याअन्वये सर्व तक्रारदार मजुरांना कामावरुन कमी केल्याचे आदेश रद्द केले तसेच प्रत्येक तक्रारदार मजुराला सेवा सलगतेसह सेवेत पुनर्स्थापीत करुन सेवेतुन काढुन टाकल्याचे दिनांकापासुन ते सेवेत पुनर्स्थापीत केल्याच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीतील मागील मजुरीची रक्कम देण्याचे आदेशीत केले.

मा.कामगार न्यायालय, भंडारा यांचे दि.२८/१०/२०१० रोजीचा न्यायनिर्णय शासनाच्या विरोधात झाल्याने शासनाचे वतीने मा. औद्योगीक न्यायालय, भंडारा येथे रिव्हीजन युएलपी क्र.१०/२०११ दाखल करण्यात आली. प्रस्तुत रिव्हीजन युएलपी क्र.१०/२०११ दि.१२/०९/२०११ रोजीच्या न्यायनिर्णयान्वये खारीज झाली.

मा.औद्योगीक न्यायालय, भंडारा यांचा रिव्हीजन युएलपी क्र.१०/२०११ मधील दि.१२/०९/२०११ रोजीचा न्यायनिर्णय शासनाचे विरोधात झाल्याने शासनाचे वतीने मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर येथे रिट पिटिशन क्र. ३४०/२०१३ अन्वये अपील दाखल करण्यात आले. प्रस्तुत रिट पिटिशन क्र.३४०/२०१३ मध्ये दि.१२/०८/२०१४ रोजी न्यायनिर्णय होवून संबंधीत मजुरांना सेवा सलगतेसह सेवेत पुनर्स्थापीत करण्याबाबत अंतरीम दिलाश्याची शासनाची मागणी मा.उच्च न्यायालयाने फेटाळली. तसेच संबंधीत मजुरांना मजुरीच्या थकबाकी देण्याच्या स्थगीतीसाठी अंतरीम दिलासा शासनास देण्यात आला. श्रीमती शेवंताबाई मनोहर गभणे व श्री. श्रीकृष्ण हरीभाउ शेंडे, रोजंदारी मजुर यांनी समान काम समान वेतन मिळणेबाबत मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा येथे युएलपी क्र.८७/२०१५ व युएलपी क्र.८८/२०१५ दाखल

केल्या होत्या. त्यामध्ये मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा यांच्या दि.०७/०३/२०१९ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार श्रीमती शेवंताबाई मनोहर गभणे व श्री. श्रीकृष्ण हरीभाउ शेंडे, रोजंदारी मजुर यांना दि.२०/०१/१९९४ ते दि.१९/११/२०१४ पर्यंतची थकबाकीच्या फरकाची (रक्कम रु.४,३५,९९८/- +रु.४,३५,९९८/-) एकुण रक्कम रु.८,७१,९९६/- उपलब्ध करून देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णयः-</u>**

मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा यांच्या दि.०७/०३/२०१९ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार श्रीमती शेवंताबाई मनोहर गभणे व श्री. श्रीकृष्ण हरीभाउ शेंडे,रोजंदारी मजुर यांना दि.२०/०१/१९९४ ते दि.१९/११/२०१४ पर्यंतची थकबाकीच्या फरकाची (रक्कम रु.४,३५,९९८/- + रु. ४,३५,९९८/-) एकुण रक्कम रु.८,७१,९९६/- ( रु. आठ लाख एकाहत्तर हजार नऊशे शहाण्णव फक्त) अदा करणे आवश्यक आहे.

त्यानुसार लेखाशिर्ष - २४०१ पिक संवर्धन, ११९ (३) रोपमळे (३) (०१) भाजीपाला रोपमळे, फळरोपमळे व स्थानिक उद्याने, (०२) मजुरी (२४०१-१७२२) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यास तसेच प्रस्तुत प्रकरणी उपविभागीय कृषी अधिकारी, भंडारा यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. न्यायालयीन प्रकरणात वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दि.१७/४/२०१५ भाग पहिला, उप विभाग-दोन, अनु.क्र.७ नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पुर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. आयुक्त कृषि कार्यालयाने मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार देय ठरणारी रक्कम शासनाचे प्रचलित नियम, अटी व शर्ती व आदेशांचे अनुपालन करण्यात यावे. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

सदरचा शासन निर्णय विधी व न्याय विभाग, नागपूर, यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.४०२-२०२४, दि.२३/०१/२०२४ रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४०११२२२०४३६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रांचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.04.01 12:53:02 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत अग्रेषितः-**

१) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर.
४) सह संचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे.
५) सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन, ५ वा माळा मुंबई-३२.
६) विभागीय कृषि सह संचालक, नागपूर.
७) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, भंडारा,
८) जिल्हा कोषगार अधिकारी, भंडारा,
९) निवड नस्ती-१३-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.